**गो.ते.रूग्णालय संकुल इमारत येथील ७ व्या मजल्यावरील पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामधिल उपसचिव आणि कर्मचा-यांच्या जागेची दुरूस्ती व नुतणीकरण या करीता प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांक:- दुरूस्ती-२०२१/प्र.क्र. ४४/पापु ०२**

**गो. ते. रूग्णालय संकुल इमारत, ७ वा मजला,**

**लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४००००१**

**दिनांक:- ११ मे, २०२२**

**<u>संदर्भ:</u>** -१) कार्यकारी अभियंता, एकात्मिकृत घटक (सां.बा.) विभाग, मुंबई - ०१ यांचे पत्र क्र. जा. क्र. काअ/एघ/५३३/२०२२ दि. ३१/०१/२०२२

**<u>प्रस्तावना :</u>**

मंत्रालयास दि. २१/०६/२०१२ रोजी लागलेल्या आगीमुळे पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची काही कार्यासने गो. ते. रुग्णालय संकुल इमारतीतील ७ व्या मजल्यावर स्थलांतरीत करण्यात आली. तसेच, काही कार्यासने नवीन प्रशासकीय भवन येथील जागेत कार्यरत होती. सबब, विभागाची सर्व कार्यासने एकाच ठिकाणी कार्यरत राहुन कामकाजामध्ये कार्यक्षमता व गतिमानता यावी याकरिता सध्याच्या बैठकव्यवस्थेत बदल करुन नवीन जागा तयार करणे व विभाग कार्यालयीन कामकाजाच्या दृष्टीने सुयोग्य व सुनियोजीत बनविणे आवश्यक झाले आहे. यास्तव, गो. ते. रूग्णालय संकुल इमारत येथील ७ व्या व ८ व्या मजल्यावरील पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या जागेचे नुतनीकरण प्रस्तावित आहे. त्यास अनुसरुन, विभागामधिल उपसचिव व कर्मचा-यांच्या जागेची दुरुस्ती व नुतनीकरण या कामाकरीता सार्वजनिक बांधकाम विभागाने संदर्भ क्र. (०१) वरील पत्रान्वये अंदाजपत्रक विभागास सादर केले आहे. सदर प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गो. ते. रुग्णालय संकुल इमारतीतील ७ व्या मजल्यावरील पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामधिल उपसचिव व कर्मचा-यांच्या जागेची दुरुस्ती व नुतनीकरण याकरीता कार्यकारी अभियंता, एकात्मिकृत घटक (सां.बा.) विभाग, मुंबई - ०१ यांनी संदर्भाधीन पत्र क्र. (०१) अन्वये स्थापत्य कामांकरिता रु. २६,६०,८८६/- (अक्षरी रुपये सव्वीस लाख साठ हजार आठशे शहाऐंशी फ़क्त) इतक्या रकमेचा प्रस्ताव सादर केलेला आहे.

२. सदर कामास सक्षम प्राधिका-यांच्या तांत्रिक मान्यतेच्या अधिन राहुन त्यानुसार खालीलप्रमाणे स्थापत्य एकूण रु. २६,६०,८८६/- इतक्या रकमेच्या खर्चास प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे स्वरूप | अंदाजित खर्च (रुपये) |
|---|---|---|
| १) | गो. ते. रुग्णालय संकुल इमारत, मुंबई येथील ७ व्या व ८ व्या मजल्यावरील पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामधिल उपसचिव व कर्मचा-यांच्या जागेची दुरुस्ती व नुतनीकरण , | २१,८१,०५४.०१ |
| २) | १ % लेबर चार्जेस | २१,८१०.५४ |
| ३) | १२ % जी. एस. टी. | २,६१,७२६.४८ |
| ४) | ४% आकस्मिक खर्च | ८७,२४२.१६ |
| ५) | ५% सेंटेज चार्जेस | १,०९,०५२.७० |
| | एकुण स्थापत्य खर्च | २६,६०,८८५.८९ |
| | **पुर्णांकात रक्कम (एकुण)** | २६,६०,८८६.०० /- |

३. उपरोक्त निधी रु. २६,६०,८८६/- (अक्षरी रुपये सव्वीस लाख साठ हजार आठशे शहाऐंशी फ़क्त ) इतका मागणी क्र मागणी क्र. “वाय-५, ३४५१ सचिवालय आर्थिक सेवा, (००) ०९० - सचिवालय, (१) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, (०१) (०१) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (३४५१ ०४६७) , २७ लहान बांधकामे (अनिवार्य )” या लेखाशिर्षाअंतर्गत सन २०२२-२३ मध्ये अर्थसंकल्पित निधीतुन सार्वजनिक बांधकाम विभागास उपलब्ध करुन देण्यात येईल.

४. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन परिपत्रक क्र. संकिर्ण-२०१९/प्र.क्र. १०/इमा-२, दि. २५/०९/२०१९ मधील तरतुदीस अनुसरुन तसेच, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग -२ दि. २०/९/२०१९ च्या सोबतच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका - १९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ समोरील नियम क्रमांक १३४ (३) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार व वित्त विभाग अ. सं. क्र. ४४९/व्यय-०३ दि. ३१/१२/२०२१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०५१११७२०१००६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Bhimrao Mane

Digitally signed by Vasant Bhimrao Mane
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, pseudonym=04E9E52AD2D2BFBC7A8BAB7F38309149E2A32DAE, serialNumber=4412BECACEF186C3494A7DFFC4896B9FFD9D66E8EC00DF8E35709DC13741075D, cn=Vasant Bhimrao Mane
Date: 2022.05.12 12:24:14 +05'30'

**(वसंत माने)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

अधिदान व लेखा अधिकारी

**प्रत :**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), महाराष्ट्र -०१, मुंबई.

२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय साहाय्यक.
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई.
५. मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई.
६. अधीक्षक अभियंता, मुंबई (सा. बां.) मंडळ, मुंबई.
७. कार्यकारी अभियंता, एकात्मिकृत घटक (सां.बा.) विभाग, मुंबई.
८. उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. उप सचिव (व्यय-०३), मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन -२२, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव, रोखशाखा, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. अवर सचिव (पापु-०४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती (पापु - ०२)